# स्त्री-भ्रूणहत्या
## कारणे व उपाय

लेखक

रजिऊल इस्लाम नदवी

अनुवाद

डॉ. इकराम खान काटेवाला

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# "स्त्री-भ्रूणहत्येला थोपविताना"

-डॉ. रजीऊल इस्लाम नदवी

वर्तमान जगतातील एक गंभीर समस्या स्त्री-भ्रूणहत्या होय. निव्वळ आपला देशच नव्हे तर संपूर्ण जग यामुळे चिंताग्रस्त आहे. यामुळे लिंग संतुलन बिघडले आहे. मुले जास्त व मुली कमी होत चालल्या आहेत. परिणामत: समाजावर अत्यंत वाईट दु:ष्परिणाम होत आहेत. समाजातील विचारवंत चिंताग्रस्त असून या दुर्गुणापासून वाचण्याचा उपाय शोधत आहेत. स्वयंसेवी संघटनादेखील प्रयत्न करीत असून आपल्या कुवतीनुसार उपाययोजना करीत आहेत. शासकीय स्तरावर याला थोपविण्याकरीता कायदे बनविले गेले आहेत. यामध्ये कठोर शिक्षेची तरतूद असूनदेखील या समस्येचा अंत दृष्टिक्षेपात नाही. ईशनिर्मित निसर्ग व्यवस्थेमधील मानवी हस्तक्षेपामुळे निर्माण झालेल्या गडबडीचे व असंतुलनाचे दु:ष्परिणाम मानवाला भोगावेच लागत आहेत.

सर्वप्रथम वाढत्या लोकसंख्येला मुख्य समस्या म्हणून पुढे केले गेले व याच्या निवारणाकरीता 'कुटुंबनियोजन' व इतर योजना मांडल्या गेल्या, जन्म नियंत्रणाचे कायदे बनविले गेले. पुढे मागे मग गर्भलिंग निर्धारणाचे प्रयत्न व्हायला लागले. विभिन्न उपकरणांद्वारे मातेच्या उदरामधील भ्रूणाचे लिंग माहिती करून घेण्याचे प्रयत्न होत असून स्त्री गर्भ असल्यास गर्भपात करविले जात आहेत. फक्त भारतातच नव्हे तर संपूर्ण जगामध्ये हीच परिस्थिती आहे. याचमुळे जागतिक स्तरावर या समस्येविषयी चिंता व्यक्त केली जात असून उपाय सुचविले जात आहेत.

जगभरात एकूण लोकसंख्येमध्ये मुली व मुलांची सरासरी १००:१०७ आहे. फ्रान्समधील 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ डेमोग्राफिक स्टडीज' तर्फे आयोजित ऑक्टोबर २००५ मधील सर्वेक्षणानुसार चीनमध्ये सरासरी १०० मुली व १३४ मुले आहेत. हे असेच चालू राहिले तर सन २०१५ ते २०३० दरम्यान अडीच कोटी युवकांना पत्नी मिळणे अशक्य होईल अशी आशंकाही यामध्ये व्यक्त केली गेली आहे. सन्हुआ संवाद समितीनुसार सन २००३ मध्ये (चीन) देशातील २४ परगण्यांमध्ये 'राष्ट्रीय लोकसंख्या व कुटुंब नियोजन आयोगा'द्वारे ही स्थिती सुधारण्यासाठी एक महत्त्वाचा प्रकल्प राबविला गेला. या योजने अंतर्गत निव्वळ मुली असलेल्या कुटुंबाला रोख रकमेव्यतिरिक्त इतर सामाजिक फायदे पुरविण्याची तरतूद आहे. मागील तीन वर्षांपासून या प्रकल्पांतर्गत मुली व मुले यांच्यातील तफावत १००:१३३.८ वरून १००:११९.६ पर्यंत घटविण्याचे लक्ष्य ठरविले गेले आहे. हा प्रकल्प आता सर्व राज्यांमध्ये व

विभागांमध्ये राबवायची योजना आहे. ('राष्ट्रीय सहारा', उर्दू १८ ऑगस्ट २००६)

भारतामध्ये दर १० वर्षांनी लोकसंख्या मोजली जाते. सन २००१ मध्ये लोकसंख्येने १,०२,७०,१५,००० ही संख्या पार केली. यामध्ये एकूण ५३,१२,७७,००० पुरुष व ४९,५७,३९,००० महिला होत्या अशी माहिती दिली गेली. अर्थात १०० पुरुषांच्या तुलनेने ९३ स्त्रीया आहे. इ. सन १९९१ मधील लोकसंख्या सर्वेक्षणाच्या तुलनेने हे अंतर जास्त आहे.

('राष्ट्रीय सहारा', ७ सप्टेंबर २००६)

देशामधील कित्येक राज्यांमध्ये मुलामुलींमधील ही तफावत खूपच जास्त आहे. विशेषत: गुजरात, महाराष्ट्र, राजस्थान, पंजाब, हरियाणा, दिल्ली व हिमाचल प्रदेश उल्लेखणीय आहेत. या राज्यांमध्ये १००० मुलांमागे ८०० ते ९०० मुली आहेत. १९९१ च्या जनगणनेनुसार पंजाबमध्ये १००० मुलांमागे ८७५ मुली होत्या आणि २००१ मध्ये ती तफावत ७९३ वर पोहोचली. याच प्रमाणे महाराष्ट्रामध्ये १९९१ च्या जनगणनेनुसार १००० मुलांमागे ९४८ मुली होत्या तर २००१ मध्ये ९१७.

('राष्ट्रीय सहारा', २९ मे २००६)

मुलींना कमी लेखण्याच्या सामाजिक प्रवृत्तीमुळेच स्त्री जन्म नाकारला जात आहे. मुलांच्या तुलनेने मुलींना कनिष्ठ समजले जाते. त्यांच्या अस्तित्वाला माता-पिता स्वत:वरील ओझे समजतात. त्यांचे पालनपोषण, त्यांची सुरक्षा, विवाहाबाबतीच्या अडीअडचणी इ. त्यांच्या (पालकां) करिता एक ओझे बनून जाते. या व्यतिरिक्त मुलींच्या बाबतीत अशा नाजुक आणि गंभीर समस्या उभ्या राहात आहेत की मुलीला जन्माला न घालणेच बरे असे आईवडिलांना वाटते.

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे या जगात जेव्हा आगमन झाले तेव्हादेखील मुलींना ओझेच समजले जात होते. त्या लोकांना नेहमीच ही आशंका रहात असे की, योग्य स्थळ न मिळाल्यास त्यांना आपल्या मुली इतर टोळीमध्ये द्याव्या लागतील. हीदेखील एक आशंका सदैव असे की, लुटारु त्यांना पकडून नेऊन दासी बनवून ठेवतील. या सर्व कारणांमुळे ज्या घरी मुलगी जन्माला येत असे, त्याचा चेहराच उतरून जात असे.

''आणि त्यांपैकी एखाद्याला मुलीच्या जन्माची खूषखबर देण्यात येते तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर काळिमा पसरतो आणि तो रक्ताचा घोट गिळून बसतो. लोकांपासून लपतछपत फिरतो की या वाईट बातमीनंतर काय तोंड दाखवायचे, विचार करतो की, अपमानित होऊन मुलीला घेऊन रहावे अथवा मातीमध्ये गाडावे? पाहा कसे वाईट निर्णय घेत आहेत.'' (दिव्य कुरआन, १६ : ५८-५९)

मुलीपासून सुटका होण्याकरिता इस्लाम पूर्व अरबी टोळ्यांमध्ये काही अमानवी प्रथा खालीलप्रमाणे होत्या.

(अ) 'प्रसुतीसमयीच एक खड्डा खोदला जात असे. जर मुलगी जन्मली तर जन्मानंतर त्वरीतच तिला गाडून टाकण्यात येत असे.' (इब्ने अब्बास)

(ब) 'मुलीला जन्मानंतर लगेचच मारून टाकून कुत्र्यासमोर टाकले जाई.'(कतादा)

(क) डोंगरकड्यावरुन खाली फेकून दिले जाई. (ख) पाण्यामध्ये बुडविले जात असे. (ग) गळ्यावरुन सुरी फिरवली जात असे. (घ) थोडी मोठी झाल्यानंतर साजशृंगारासहित वाळवंटामध्ये नेऊन एका खोल खड्ड्यामध्ये ढकलून देऊन वरुन माती ढकलली जात असे. (तफसीर-ए-कबीर)

आजही वेगळी परिस्थिती नाही. जैसलमेर (राजस्थान) मधील 'देवडा' या गांवाबद्दल प्रकाशित झालेल्या एका अहवालामध्ये हे नमूद केले गेले आहे की, तेथे मागील १०० वर्षामध्ये एकाही मुलीचे लग्न झालेले नाही. जन्मत:च त्यांना मारुन टाकले जात आहे. कधी कधी तर हे काम जन्मदाती आईच करीत असे. मातेच्या दूधाबरोबरच नवजात मुलीला अफू चारली जाते. अथवा नाकावर वाळू भरलेली पिशवी ठेवली जाते किंवा नाका तोंडामध्ये वाळू भरली जाते. गोधडी अथवा उशी चेहऱ्यावर टाकून ठेवली जाते जेणेकरून श्वास बंद पडावा नाहीतर तोंडामध्ये मिठाचा तोबरा भरला जातो. ('राष्ट्रीय सहारा', ९ सप्टेंबर २००६)

स्वत:ला प्रगत समजणारा वर्ग तर इतका निर्दयी आहे की शिशुच्या जन्माचीदेखील वाट पहात नाही. गर्भावस्थेतच स्कॅनिंग करुन मुलगा की मुलगी हे पाहिले जाते. मुलगी असेल तर गर्भपातच होतो. याचसाठी १९९४ मध्ये एक कायदा बनविला गेला होता. Natal Diagnostic Technique Regulation & Prevention of Misuse Act. या कायद्यान्वये गर्भलिंग निदान गुन्हा ठरविला गेला असूनदेखील दरवर्षी ५ ते ७ लाख मुलींची गर्भामध्येच हत्या केली जाते. ('राष्ट्रीय सहारा', ६ जून २००६)

अशा Fertility Centres वर वेळोवेळी छापे घातले जात आहे. हे कार्य करणाऱ्या डॉक्टरांना अटक केली जाते, त्यांच्याविरुद्ध खटले चालतात आणि त्यांना शिक्षादेखील दिली जाते. तरीदेखील या सामाजिक कुकर्माला थोपविणे तर दूरच उलट त्याचा प्रसार व फैलावदेखील थांबविता आला नाही.

## इस्लामी उपाय

इस्लाम भ्रूणहत्येला घोर अपराध ठरवितो, व याला थोपविण्यासाठी विविध मार्ग चोखाळतो. ज्या ज्या कारणांमुळे अथवा आशंकांमुळे भ्रूणहत्या केली जाते, त्यांनाच इस्लाम दूर करतो. इस्लामनुसार मुलगी ही अहोभाग्य, शालिनता व कल्याणपद आहे. तिच्या पालनपोषणाची व उत्तम प्रशिक्षणाची शिकवण तो देतो. सामाजिक पातळीवर हे खूपच उत्तमप्रद सिद्ध झाले आहे.

सर्वप्रथम जनसामान्यांची मानसिकता तयार करण्याचे काम इस्लामने केले. कारण कुठलाही कायदा तोपर्यंत प्रभावशाली होत नाही जोपर्यंत जनसामान्य त्याला जुमानित नाही किंवा जोपर्यंत त्याच्या गुणधर्मांचे आकलन होत नाही. तसेच न जुमानल्यामुळे होणाऱ्या नुकसानीची जाणीव त्यांना होत नाही.

इस्लामने प्रतिपादन केले की हे एक शैतानी कृत्य आहे.

''आणि अशाच प्रकारे कित्येक बहूदेववादींसाठी त्यांच्या भागिदारांनी (कल्पित देवांनी) त्यांच्या संतानाच्या हत्येला आकर्षक बनविले आहे, जेणेकरून त्यांना विनाशात टाकावे व त्याकरीता त्यांचा धर्म धूसर बनवून टाकावा.''

(दिव्य कुरआन, ६ :१३७)

''खचित नुकसानीमध्ये आहेत ते लोक ज्यांनी अज्ञान व मुर्खपणाखातीर आपल्या मुलांना ठार केले.'' (दिव्य कुरआन, ६ :१४०)

काही अरबी टोळ्या मुलींना आर्थिक लचांड समजून त्यांना मारुन टाकत असत. कारण मुले मोठी झाल्यानंतर कामामध्ये मदत करतील परंतु मुली काहीच कामाच्या नसतात.

कुरआनने स्पष्ट केले की उपजीविकेच्या किल्ल्या अल्लाहच्या हाती आहेत. या धरतीवरील सर्व सजीवांच्या उपजीविकेची जबाबदारी ईश्वराने घेतली आहे. सशक्त असो वा अशक्त, धष्टपुष्ट असो वा अपंग, स्वतः उपजीविकेकरिता धावपळ करीत असो वा दुसऱ्यावर निर्भर असो, सर्वांना भाकरी मिळते ती अल्लाह (ईश्वरा) च्या आज्ञा व मर्जीनेच.

''आणि आपल्या संततीला दारिद्रयाच्या भीतीने ठार मारु नका, आम्ही तुम्हालादेखील उपजीविका देतो व त्यांनादेखील (देतो).'' (दिव्य कुरआन,६:१५१)

''आपल्या संततीला दारिद्रयाच्या भीतीने ठार करु नका. आम्ही त्यांनादेखील उपजीविका देऊ आणि तुम्हालासुद्धा. वस्तुतः त्यांची हत्या करणे एक मोठा अपराध आहे.''

(दिव्य कुरआन, १७:३१)

इस्लाममध्ये मुलींची हत्या त्या अपराधांमध्ये गणली जाते ज्यांना अल्लाह व त्याच्या पैगंबरांनी अवैध ठरविले आहे.

"अल्लाहने तुम्हांकरिता अवैध ठरविले आहे, मातापित्यांची अवज्ञा, मुलींना जिवंत गाडून टाकणे व वायफळ खर्च करणे." (हदीस : मुस्लिम)

मुलींच्या हत्येला त्या घृणित कार्यांमध्ये समाविष्ट केले आहे ज्याबाबत परलोकामध्ये प्रश्नोत्तरे होतील. "आणि जेव्हा जीवंत गाडलेल्या मुलीला विचारले जाईल, की ती कोणत्या अपराधापायी ठार केली गेली?" (दिव्य कुरआन, ८१:८- ९)

## संततीची हत्या न करण्याची प्रतिज्ञा

ईश्वराचे दूत आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या अनुयायाकडून ज्या ज्या गोष्टींचे वचन घेत असत त्यामध्ये संततीची हत्या न करण्याचेदेखील कलम होते. हुदैबिया येथील तहानंतर ते मक्का विजयापूर्वीपर्यंत अनेक महिला मक्केहून स्थलांतर करुन मदीना पोहोचल्या. ईश्वराने आपल्या पैगंबरांना त्यांकडून वचन घेण्याचा आदेश दिला.

"हे नबी (स.) जेव्हा श्रद्धावंत स्त्रिया तुम्हाजवळ बैअत (प्रतिज्ञा) करण्याकरिता येतील आणि या गोष्टीची प्रतिज्ञा करतील की अल्लाहबरोबर कुठल्याही वस्तूला सामील करणार नाही, चोरी करणार नाही, व्यभिचार करणार नाही, आपल्या संततीची हत्या करणार नाही, आपल्या हातापायासमोर कोणतेही कुभांड रचणार नाही आणि कुठल्याही चांगल्या कामामध्ये तुमची अवज्ञा करणार नाही, तर त्यांच्याकडून बैअत (प्रतिज्ञा) घ्या, आणि त्यांच्या बाबतीत अल्लाहजवळ क्षमेची प्रार्थना करा. निःसंशय अल्लाह क्षमा करणारा आणि दया करणारा आहे." (दिव्य कुरआन, ६०:१२)

असेच वचन व प्रतिज्ञा पैगंबरांनी पुरुषांकडूनही घेतल्या, मदीनेला स्थलांतरापूर्वी ज्या ज्या नशीबवान लोकांनी ईशदूताच्या हातावर प्रतिज्ञा केली होती त्यामध्ये माननीय उबादा बिन सामित (रजि.) होते. ते कथन करतात की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "माझ्या जवळ या गोष्टींची प्रतिज्ञा करा की, अल्लाहच्या बरोबरीने इतर कोणालाही सम्मिलीत करणार नाही, चोरी करणार नाही, व्यभिचार करणार नाही आणि आपल्या संततीची हत्या करणार नाही." (हदीस : बुखारी)

मुलीचे अस्तित्व पुरुषाकरिता संकट अथवा अडचण आहे हे इस्लामला मान्य तर नाहीच उलट त्याने मुलीला स्वर्गप्राप्तीचे साधन ठरविले आहे.

माननीय अनस बिन मालिक (रजि.) उल्लेख करतात की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की, "ज्या व्यक्तीने दोन मुलीचे पालनपोषण सज्ञान होईपर्यंत केले तो अंतिम न्यायनिवाड्याच्या दिवशी माझ्या इतका जवळ राहील (हे शब्द उच्चारतांना

पैगंबर (स.) नी आपली दोन बोटे जुळवून दाखवली.)'' (हदीस : मुस्लिम)

''ज्या व्यक्तीने दोन मुलींचे पालनपोषण केले, ती व्यक्ती आणि मी स्वर्गामध्ये अशाप्रकारे प्रवेश करु (यावेळी पैगंबर (स.) यांनी आपल्या दोन बोटांना दर्शविले.)'' (हदीस : तिर्मिजी)

माननीय इब्ने अब्बास (रजि.) कथन करतात की, ईशदूत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''ज्याच्या दोन मुली असून त्या जवळ आहेत तोपर्यंत तो त्यांच्याशी सद्व्यवहार करीत असेल, तर त्या त्याच्याकरिता स्वर्गप्राप्तीचे साधन बनतील.'' (हदीस : सुनन इब्ने माजा)

माननीय उकबा बिन आमिर (रजि.) उल्लेख करतात की, पैगंबर (स.) यांचे कथन आहे की, ''ज्याला कुणाला तीन मुली असून त्याने संयम बाळगला तसेच आपल्या कुवतीनुसार त्यांना खाऊ-पिऊ घातले तर ते कर्म प्रलयाच्या दिवशी नरकापासून त्याच्याकरिता ढाल बनेल.'' (हदीस : सुनन इब्ने माजा)

पैगंबरांच्या कथनामध्ये मुलीच्या शिक्षण व प्रशिक्षणाबाबत सक्त ताकीद केली गेली आहे. माननीय अबू सईद अल खुदरी (रजि.) कथन करतात की, पैगंबर (स.) नी सांगितले की, ''ज्या व्यक्तीने तीन मुलींचे पालनपोषण केले, त्यांना समाज-रीत व शिष्टाचार शिकविला, त्यांचे विवाह करून दिले आणि त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहीला, त्याच्याकरिता स्वर्ग आहे.'' (हदीस : अबू दाऊद)

माननीय इब्ने अब्बास (रजि.) उल्लेख करतात की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''ज्याने तीन मुलींचे अथवा भगिनींचे पालनपोषण केले, त्यांना शिष्टाचार शिकविला, त्याबरोबर सहानुभूतीने वागला येथपावेतो की ईश्वराने त्यांना (मुलींना) तृप्त केले, त्याच्याकरिता ईश्वराने स्वर्ग अनिवार्य केला आहे.'' कथन करणाऱ्यांनी नमूद केले आहे की हे सर्व ऐकून एकाने विचारले, ''हे पैगंबर (स.) जर एखाद्याला दोनच मुली अथवा भगिनी असतील आणि तो असाच त्यांच्याशी वागला तर...?'' पैगंबर (स.) म्हणाले, ''त्याच्यासाठीदेखील हेच प्रतिफल आहे.'' कथनकर्ता नमूद करतो की, जर उपस्थितांपैकी एखाद्याने एका मुलीबरोबर अथवा एका बहिणीबरोबर सद्व्यवहाराबद्दल विचारले असले तर पैगंबर (स.) यांनी हेच उत्तर दिले असते. (हदीस : शरह अस्सुन्ना)

इस्लामच्या या शिकवणींनी मुलींना समाजामध्ये इतकी प्रतिष्ठा व सन्मान दिला आहे. यापेक्षा वेगळी कल्पना केलीच जाऊ शकत नाही. ज्या समाजामध्ये मुलींचे अधिकार नाकारले जातात अथवा त्यांना कनिष्ठ समजले जाते त्याठिकाणी मुलींची स्थिती सुधारण्यासाठी व त्यांना वर उचलण्याकरिता या शिकवणीची मदत होऊ शकते.

# स्त्री-भ्रूणहत्या

- जैनुल आबिदीन मंसुरी

पाश्चिमात्य देशांप्रमाणे नारी अत्याचार, अपमान व शोषणाच्या ज्या ज्या शापांनी भारतदेखील ग्रस्त आहे, त्यांमध्ये अत्यंत क्लेषकारक 'स्त्री-भ्रूणहत्या' होय. आश्चर्य तर हे आहे की, अमानवतेची, क्रुरतेची व अनैतिकतेची ही सद्यस्थिती आमच्या देशाची 'विशेषता' बनली आहे... ज्या देशाला गर्व आहे धर्मप्रधान समाजाचा, अहिंसा व अध्यात्मिकतेचा व स्त्रीत्वाच्या गौरवाचा व महिमेचा!!

तसे पाहता प्राचीन इतिहासामध्ये स्त्री कौटुंबिक व सामाजिक जीवनाच्या नीचतम श्रेणीमध्ये दृष्टीस पडते परंतु ज्ञान, विज्ञानाची प्रगती तसेच संस्कृती व सभ्यता यामधील उत्क्रांतीमुळे परिस्थितीमध्ये बदल नक्कीच घडला आहे. तरीदेखील अपमान, दुर्व्यवहार, अत्याचार व शोषणाच्या काही नवीन व आधुनिक (कु)परंपरांद्वारे आमच्या संवेदन-शीलतेला खुले आवाहन दिले जात आहे. कन्या वधाच्या सीमित समस्येला विज्ञान व आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करून अल्ट्रा सोनोग्राफी द्वारे 'गर्भ लिंग चिकित्से'द्वारे व्यापक प्रमाणावर 'स्त्री-भ्रूणहत्या' बनविले गेले. शैक्षणिक व आर्थिक दृष्ट्या पुढारलेल्या वर्गामध्ये ही प्रवृत्ती जोमाने फोफावत आहे, ही जास्त चिंतेची बाब आहे.

या व्यापक समस्येला थोपविण्याबाबत गेल्या काही वर्षांपासून चिंता व्यक्त होऊ लागली आहे. घोषवाक्यांपासून कायदे बनविण्यापर्यंतच्या सर्व वाटा चोखाळून झाल्या आहेत. जेथ-पावेतो कायदा व प्रशासनाचा प्रश्न आहे तेथे तर विटंबनाच ही आहे की, अपराध तीव्रगतीने पुढे पुढे जात असून कायदा व प्रशासन हळूहळू व तेही अंतर राखून चालले आहे. स्त्री मुक्ती आंदोलने अधुन मधुन चिंता व्यक्त करीत असली तरी नाईट क्लब संस्कृती, सौंदर्य प्रतियोगिता संस्कृती, कॅटवॉक संस्कृती, पब संस्कृती, कॉलगर्ल संस्कृती, वॅलेन्टाईन संस्कृती, आधुनिक तसेच अतिआधुनिक संस्कृती मधील अनिर्बंध स्वैराचार, या सर्वांबाबत आणि (अमूल्य अशा मानवाधिकारांचा हवाला देऊन) विकास व प्रगती बाबत जो उत्साह दाखविला जातो त्यांच्या तुलनेने स्त्रीभ्रूण हत्या थांबविण्याबाबत कमी तत्परता दाखविली जाते.

काही वर्षांपूर्वी (मानव अधिकारांविषयी आयोजित) एका मुस्लिम संमेलनामध्ये बोलताना एका प्रसिद्ध व प्रमुख एन.जी.ओ. (बिगर शासकीय सेवा भावी संस्था) च्या विभागीय (महिला) सचीव उद्‌गारल्या की ''देशातील पुरुष-स्त्री प्रमाणातील तफावत वाढत चालली आहे (१००० : ९७० ते १००० : ८४०). तरीदेखील तुलनेने इतर

समाजापेक्षा मुस्लिमांमध्ये ती तफावत नगण्य आहे. मी मुस्लिम समाजाला विनंती करते की, त्यांनी याबाबतीत इतर समाजाचे व राष्ट्राचे मार्गदर्शन व मदत करावी.

वर उल्लेखित लिंग असंतुलनाबाबत एकाबाजूने हीच चिंता आमचे समाजधूरीण व्यक्त करीत असतात. दुसरीकडे प्रकर्षाने ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे की, इतर समाजापेक्षा मुस्लिम समाजामध्ये परिस्थिती खूप चांगली आहे. या परिस्थितीची कारणे व कारण घटक तुलनात्मक विश्लेषणानंतरच स्पष्ट होऊ शकतील. मुस्लिम समाजात सून पेटविली जात नाही, बलात्कार करून हत्या होत नाही, आई-बापाच्या खांद्यावरून हुंडा व लग्नाच्या खर्चाचा ओझा दूर करण्यासाठी मुली येथे आत्महत्या करीत नाहीत. पत्नीशी पटत नसेल तर सुटका करून घेण्यासाठी 'हत्ये'ऐवजी 'तलाक'चा विकल्प आहे. या उपर स्त्री-भ्रूणहत्येचा शाप मुस्लिम समाजामध्ये नाही.

वस्तुत: भारतीय मुस्लिम समाज पूर्णपणे एतद्देशीय असून भारतीय समाजाचे एक अंग आहे. येथील उपजत परंपरा व रीतिरिवाजां मधील निरंतर सहजीवन व देवाणघेवाणीमुळे मुस्लिम समाजावर प्रभाव पडला आहे व यामुळे तो स्वत:ला आदर्श इस्लामी समाज बनवू शकला नाही. खूपशा कमतरता त्यामध्ये आहेत. तरीदेखील जे वैशिष्ट्यपूर्ण सद्गुण आढळतात त्याचे कारण इतर काहीदेखील नसून या समाजाच्या प्रगती व जडणघडणीमधील इस्लामचे योगदान व प्रभावशाली भूमिका हेच आहे.

१४०० वर्षांपूर्वी जेव्हा इस्लामचा प्रवेश अरब द्वीपकल्पामध्ये असभ्य व निरक्षर समाजामध्ये झाला तेव्हा त्या समाजामध्ये अनैतिकता, चारित्र्यहीनता, अत्याचार, अन्याय व अश्लीलतेबरोबर स्त्रीजातीच्या उपमर्दाचे व कन्याहत्येचे असंख्य प्रकार प्रचलित होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे ईशमार्गातील कार्य ही काही एक अशी 'समाज सुधारणा मोहीम' नव्हती जिचा प्रभाव जीवनाच्या काही अंगावर मर्यादित कालावधीकरिता पडावा व नंतर पुन्हा 'येरे माझ्या मागल्या' व्हावे. याउलट पैगंबर (स.) चे लक्ष्य 'संपूर्ण-परिवर्तन' तसेच सर्वसमावेशक व स्थायी 'क्रांती'चे होते. याचकरिता पैगंबर (स.) नी मानवी जीवनाच्या प्रत्येक समस्यांना अलग अलग सोडविण्यापेक्षा मुळावरच घाव घालण्याचे कार्य केले. इस्लामच्या दृष्टिकोनातून या समस्येचा मूळ बिंदू सामाजिक व्यवस्था अथवा कायदा व प्रशासन नसून स्वयं 'मानव' आहे... अर्थात व्यक्तीचे अंतरात्मा, त्याची प्रकृती व मनोवृत्ती, त्याचा स्वभाव, सद्सद्विवेकबुद्धी, त्याच्या धारणा व अवधारणा, विचारसरणी, मानसिकता तसेच मनोप्रकृती होय!

इस्लामच्या धोरणानुसार मानवाचा आपल्या निर्माणकर्त्या ईश्वराशी वास्तविक व नैसर्गिक संबंध जितका कमजोर असतो, समाजात तितके बिघाड निर्माण होतात.

म्हणून इस्लामने मानवामध्ये एकेश्वरत्वाची भक्कम धारणा व पारलौकिक जीवनातील कर्मानुसार चांगला अथवा वाईट मोबदला (स्वर्ग अथवा नरक) मिळण्याचा अतुट विश्वास निर्माण करून पहिले पाऊल टाकले. पुढील पाऊल हे होते की याच धारणेला व विश्वासाला पायाभूत ठरवून समाजामध्ये सत्कर्याच्या प्रस्थापनेसाठी व संवर्धनाकरिता तसेच दुष्कृत्यांच्या निर्मूलनाचे कार्य करावे. इस्लामची संपूर्ण जीवनव्यवस्था याच सिद्धान्तावर आधारित असून याचद्वारे कुप्रवृत्ती व दुष्कृत्यांचे निवारण होते.

कन्यावधाला समूळ नष्ट करण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अभियान चालविण्याऐवजी, भाषण करण्याऐवजी, आंदोलन करण्याऐवजी, कायदा-पोलीस, न्यायालय-तुरुंग हे चालविण्याऐवजी फक्त एवढेच विधान केले, ''ज्याला एक मुलगी (अथवा अधिक मुली) असून तो त्यांना (प्रचलित प्रथेनुसार) जीवंतच गाडून टाकून हत्या करीत नसून, त्यांचे प्रेमाने व आपुलकीने पालनपोषण करील, त्यांना (सत्कर्म, शालीनता, सदाचारण व ईशपरायणतेचे) उत्तम ज्ञान देईल, तसेच मुलांना त्यांच्यावर प्राधान्य देणार नाही व उत्तम वर बघून त्यांची गृहस्थी वसवून देईल, तो पारलौकिक जीवनामध्ये स्वर्गामध्ये माझ्यासोबत राहील.''

पारलौकिक, जीवनावर दृढ विश्वास करणाऱ्या लोकांवर वरील संक्षिप्त शिकवणीने जादुप्रमाणे प्रभाव टाकला. ज्यांचा चेहरा मुलीच्या जन्मामुळे काळवंडत असे (कुरआन १६ : ५८) त्यांचे चेहरे या विश्वासाने उजळले की त्यांना स्वर्गप्राप्तीचे साधनच मिळाले. तद्नंतर मुलगी शाप नव्हे तर वरदान, ईशकृपा, सौभाग्य व भरभराट समजली जाऊ लागली आणि पाहता पाहता समाजाने कात टाकली.

मानवी स्वभावानुसार मानव एखादे कृत्य कधी लाभाच्या आशेने करतो, तर कधी भीती, भय व नुकसानीपासून वाचण्याकरिता करतो. मानवाच्या निर्माणकर्त्या ईश्वराव्यतिरिक्त इतर कोण बरे मानवी प्रवृत्ती व प्रकृतीला जाणू शकेल? यास्तव कन्याहत्या करणाऱ्यांना अल्लाहने चेतावणी दिली आहे. या अजब चेतावणीची शैली अशी आहे की, अपराध्याला नव्हे तर हत्या केल्या गेलेल्या मुलींना संबोधून कुरआनमध्ये प्रश्न केला गेला आहे.

''आणि जेव्हा (परलोकांत हिशोबाच्या व न्यायनिवाडाच्या दिवशी) जिवंत गाडल्या गेलेल्या मुलीला (ईश्वराकडून) विचारले जाईल, की तुझी हत्या कुठल्या अपराधापाई केली गेली.'' (दिव्य कुरआन, ८१:८- ९)

या सूरहनुसार कन्याहत्या करणाऱ्यांना सक्त चेतावणी दिली गेली असून सर्वोच्च व सर्वशक्तीमान न्यायाधीश अल्लाहच्या न्यायालयात कठोर शिक्षा मिळणे ठरलेले आहे.

एकेश्वरत्वाच्या धारणेचा व त्या अंतर्गत पारलौकिक जीवनावरील दृढविश्वासाचाच हा चमत्कार होता की मुस्लिम समाजामधून कन्याहत्येचा शाप समूळ नाहीसा झाला. गत १४०० वर्षांपासून हाच विश्वास, हीच धारणा सूक्ष्मपणे मुस्लिम समाजामध्ये कार्यरत आहे आणि आजदेखील भारतीय मुस्लिम समाज कन्याहत्येपासून दूर, सुरक्षित आहे. देशाला या शापापासून मुक्त करण्यासाठी इस्लामच्या चीरस्थायी व प्रभावशाली विकल्पाचा परिचय करुन देणे ही सद्यस्थितीची नितांत गरज आहे.

# "बंद करा या स्त्री-भ्रूण हत्या"

- विद्या प्रकाश

मोठ्या प्रमाणावर शिक्षण प्रसाराचा गाजावाजा करूनदेखील भ्रूणहत्या, हुंडाबळी, सतीप्रथा, देवदासी प्रथा व इतर विविध रूपांतील स्त्री अत्याचार आजही प्रचलीत आहेत. मध्ययुगीन भ्रूणहत्येच्या पारंपारिक पद्धती ऐवजी अत्याधुनिक चिकित्सापद्धत व वैद्यकीय तंत्रज्ञान या करिता राबविले जात आहे.

स्त्री अत्याचारांपैकी स्त्रीभ्रूण हत्या कमी धोकादायक व भयंकर मुळीच नाही. पूर्वी नवजात व आता जन्म न झालेल्या बालिकांना मृत्यूची वाट दाखविली जात आहे. उघडपणे अल्ट्रा सोनोग्राफी द्वारे गर्भलिंग चिकित्सा केली जात असून काही रुपयांच्या मोबदल्यात स्त्री गर्भाला जन्मापुर्वीच संपवले जात आहे. या बाबतची आकडेवारी इतकी भयानक व अंगावर काटा आणणारी आहे की, कुठल्याही संवेदनशील व्यक्तीचा अंतरात्मा व हृदय पिळवटून जाते. याबाबतीत सर्व कायदे व नियम मृगजळ बनून गेले आहेत.

या बाबतच्या एक सर्वेक्षणानुसार भारतामध्ये प्रतिवर्षी लाखापेक्षा जास्त महिला गरोदरपणामध्ये मृत्यूमुखी पडतात. यातील अकरा टक्के महिलाचा मृत्यू गर्भपाताशी संबंधीत आहे. सद्यस्थितीमध्ये स्त्री-भ्रूणहत्येने सामाजिक व वैद्यकीय समस्येचे रूप धारण केले आहे. हे स्पष्ट नाही की किती महिलांचे गर्भपात झाले आणि किती महिलांना स्वेच्छेने अथवा एखाद्या पारिवारीक अथवा सामाजिक विवशतेतून गर्भपात करावे लागले.

याचीदेखील आकडेवारी उपलब्ध नाही की किती महिलांना अशा गर्भपातादरम्यान मृत्यूने कवटाळले आहे. आमच्या देशातील विभिन्न प्रादेशिक, क्षेत्रिय, भाषिक व आर्थिक विषमतेमधूनदेखील ही गोष्ट प्रकर्षाने जाणवते की, सर्वत्र स्त्री भ्रूणहत्येची कारणे समान आहेत. वंशाला दिवा हवा व निकृष्ठ आर्थिक स्तरामुळे भेडसावणाऱ्या हुंडा व इतर समस्या इ.

या बाबतीत शासन गफलतीमध्ये आहे. गर्भपाताचे प्रमाण वाढो अथवा खाली जावो कुणाला निष्कारण आपली कोप नासवायची आहे? अशा परिस्थितीमध्ये निव्वळ अनुमानच बांधावे लागतात.उपलब्ध आकडेवारीला कुठवर सत्यनिष्ठ व वस्तुस्थितीदर्शक मानावे हा प्रश्नच आहे. एका अंदाजानुसार दरवर्षी आपल्या देशामध्ये ५ लाखापासून २ कोटींपर्यंत गर्भपात केले/करविले जातात. त्याच प्रमाणे गर्भधारणेच्या

वयोगटातील दर हजारांमागे २६० ते ४५० महिला विभिन्न कारणासाठी गर्भपात करतात. 'फॅमिली मेडीसीन इंडिया' या पत्रिकेने रामी छाबडा व नुना शील द्वारा संचलीत १९९४ मधील एका सर्वेक्षणानुसार इ. सन १९९२ मधे भारतात एकंदर १ कोटी १० लाख गर्भपात केले गेले. यांतही आश्चर्य नाही की देशामध्ये गर्भपाताला वैद्यानिक मान्यता २० वर्षापूर्वीच मिळाली असूनदेखील यामधील केवळ ६.६% गर्भपातच नोंदणीकृत होते.

एका अहवालानुसार १९९१ पासुन आजपर्यंत नोंदणीकृत गर्भपाताच्या संख्येमध्ये बदल झालेला नाही. १९९१ मध्ये मान्यताप्राप्त गर्भपात केंद्रामधून एकूण ६ लाख ३६ हजार ४५६ गर्भपात झाले, तर १९९८-९९ या कालावधीमध्येही संख्या ६ लाख ६६ हजार ८८२ होती. असा सर्वमान्य समज आहे की, एका कायदेशीर वैद्यकीय गर्भपातामागे कमीत कमी १० ते १२ बेकायदेशीर गर्भपात होतात. जागतिक बँकेच्या १९९६ च्या अहवालानुसार प्रचलित अत्याधुनिक वैद्यकीय सेवेद्वारे दरवर्षी ५० लाख अवैध गर्भपात केले अथवा करविले जातात. आय.सी.एम.आर. या संस्थेच्या सर्वेक्षणानुसार इ.स. १९८९ मध्ये देशामध्ये ४० लाख बेकायदेशीर गर्भपात असुरक्षितरित्या करण्यात आले.

सुलभ गर्भपाताला दिलेल्या कायदेशीर परवानगीमुळे स्त्रीभ्रूणा करिता जीवन असुरक्षित झाले आहे. कुटुंबामध्ये पुत्रप्राप्तीची प्रेरणा इतकी तीव्र असते की, धर्मभीरु व कायद्याचे पालन करणाऱ्या महिलादेखील कायद्याचे उल्लंघन करुन व जीव धोक्यात घालून गर्भपाताकरिता संमती दर्शवितात.

८० च्या दशकाच्या शेवटी देशामध्ये गर्भ लिंग निदानाचे आधुनिक तंत्रज्ञान लोकप्रिय होत गेले.

मागील ५ वर्षामध्ये गर्भ लिंग निदान व स्त्रीभ्रूण हत्येच्या आकडेवारीमध्ये चिंतनीय वाढ झाली आहे. पंजाबच्या आरोग्य विभागाच्या मा. संचालकानी मान्य केले आहे की, १९९७ मधे राज्यामध्ये पुरुष व स्त्री प्रमाण प्रती हजारी ७५१ पर्यंत घसरले आहे. आर्थिक दृष्टया संपन्न असलेल्या दिल्ली व हरयाणामधील परिस्थिती जास्त वेगळी नाही. जेथे नेहमीच पुरुषसत्ताक संस्कृती राहिली अशा उत्तर पश्चिम भारतातच नव्हे तर, आश्चर्यकारकरित्या मणीपूर, केरळ व आसाम सारख्या राज्यांमध्ये जेथे इतर राज्यांच्या तुलनेने महिलांमध्ये जास्त जागरुकता व अधिकार आहेत स्त्रीभ्रूण हत्येचे प्रमाण लक्षणीय आहे.

या संबंधी उपलब्ध आकडेवारी नुसार पुत्रप्राप्तीच्या अभिलाषेपोटी दरवर्षी ४०

लाख माता अवैध गर्भपाताकरिता आपला जीव धोक्यामध्ये टाकण्यास तयार असतात. इंडियन मेडीकल असोसिएशननुसार तर ५० लाखांचा टप्पा कधीच पार झाला आहे. राष्ट्रीय लोकसंख्या आयोगानुसार गर्भामध्येच मारल्या गेलेल्या बालिकांची संख्या चार ते पाच कोटी आहे, शासकीय तक्त्यांनुसार मात्र देशामध्ये आजपर्यंत निव्वळ १०७ स्त्रीभ्रूण हत्या झाल्या आहेत, हे हास्यास्पद नव्हे काय?

सर्वसामान्यपणे गर्भपाताचा निर्णय स्त्री घेत नाही. विशेषत: हुंड्याची दुष्ट प्रथा, कौटुंबिक व आर्थिक कारणे या अपराधाकरिता प्रेरणा देतात. गंभीर परिस्थिती तेव्हा निर्माण होते जेव्हा आर्थिक कारणामुळे अथवा गरीबीमुळे बोगस डॉक्टरांची मदत घेतली जाते. कधी कधी हे जीवावर बेतते. पावसाळ्यात उगवणाऱ्या कुत्र्यांच्या छत्र्यांप्रमाणे ग्रामीण व शहरी भागांमध्ये उगवलेल्या तथाकथित नर्सिंग होम व प्रसुति केंद्रामधून या अवैध धंद्यामधून मोठी उलाढाल होत आहे.

अशा खालच्या पातळीवरील दुष्कृत्ये निव्वळ कायदे बनवून थांबत नसतात तर सामाजिक जागृती व लोकशिक्षणाची नितांत गरज आहे. या मुद्यावर स्त्री संघटनांनी पुढे आले पाहिजे. याशिवाय शासनाने आपली जबाबदारी ओळखून एम.टी.पी. ॲक्ट या कायद्याला कठोरपणे लागू केले पाहिजे. रुग्णालये व सोनोग्राफी मशिनांची योग्य नोंदणी करवावी. तसेच १९९४ च्या पी.एन.डी.टी. कायद्याचे उल्लंघन करणाऱ्यांचा तमा न बाळगता कठोर कारवाई करावी व सर्वोच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार अल्ट्रासोनोग्राफीची केंद्रे व गर्भपात केंद्रावर बारीक नजर ठेवावी लागणार आहे.

# "'कधी थांबतील या भ्रूणहत्या?"

- मुहम्मद युसूफ "मुन्ना"

वस्तूत: भ्रूणहत्या या मानव हत्या आहेत. या किळसणीय अपराधामधील वाढीमुळे समाज निव्वळ कलंकीतच होत नाही तर नैतिकतेची पातळीदेखील खालावत चालली आहे. या निर्घृण अपराधामुळे केवळ जगण्याच्या अधिकारावरच अतिक्रमण केले नाही तर असंख्य जीवांना जन्मापूर्वीच गिळंकृत केले आहे. या दुष्कृत्यामध्ये लीप्त जीवरक्षक समजल्या जाणाऱ्या डॉक्टरांची संख्या मोठी आहे, ज्यांच्या हस्ते दररोज अबोध, अविकसित मानवी जीवन संपविले जात आहे. सर्वांत कष्टप्राय गोष्ट ही आहे की ममतेचे प्रतिरुप असणाऱ्या महिलादेखील यामध्ये लीप्त आहेत.

या निर्घृण अपराधाच्या मुळाशी काही विशिष्ट सामाजिक अपप्रवृत्ती आहेत ज्यांच्यामुळे यांना चालना भेटत आहे. याच सामाजिक अपप्रवृत्तीमुळे बहुधा स्त्री विवशतेने भ्रूणहत्येकरिता तयार होते कारण चांगल्या वा वाईट कृत्यांकरिता काही अंशी समाज कारणीभूत असतो. ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे की, जोपर्यंत समाजामध्ये मुलामुलींमध्ये भेदभाव, हुंडाप्रथा, लोकसंख्या नियंत्रण, धार्मिक कर्मठपणा, धनाची आसक्ती इ. गोष्ट अस्तित्वात राहतील, भ्रूणहत्येवर अंकुश ठेवणे कठीण आहे. ही गोष्ट प्रकर्षाने जाणवते, की नरभ्रूणाच्या तुलनेने स्त्रीभ्रूणाची हत्या मोठ्या प्रमाणावर होत आहे. याची कारणे शोधण्याचा प्रयत्न करू या.

जेव्हांपासून लोकसंख्या नियंत्रणाच्या कार्यक्रमाचा अर्थ 'छोटापरिवार सुखी परिवार' असा लावला गेला आणि छोटे कुटुंब ही फॅशन बनली, तेव्हापासून भ्रूणहत्येच्या दरामध्ये वाढ झाली. लोकसंख्या नियंत्रणाच्या साधनामध्ये गर्भपात/ भ्रूणहत्येचा समावेश केला गेला. लोकसंख्या नियंत्रणाच्या लावलेल्या सुरामुळे तसेच छोट्या कुटुंबाच्या फॅशनने जनसामान्यांना भ्रूणहत्येकरिता प्रवृत्त केले.

भारतीय समाजामध्ये अशा हत्यांची परंपरा पूर्वीपासून आहे. गर्भलिंग चिकित्सेच्या अत्याधुनिक तंत्रापूर्वीदेखील मुलीच्या जन्मानंतर प्राचीन रूढी परंपरांमुळे तिला मारून टाकण्यात येत असे. आजदेखील स्त्रीपुरुष लिंगभेदामुळेच हत्या होत आहेत. फक्त कारणे व पद्धती बदलल्या आहे. आजदेखील मुलांच्या तुलनेने मुलींची गर्भामध्ये हत्या जास्त प्रमाणात होत आहे. स्त्री-भ्रूणहत्येमध्ये समाजामधील हुंडारुपी राक्षसाचा फार मोठा वाटा आहे. स्त्री-भ्रूणहत्ये व्यतिरिक्त हुंडाबळी, अत्याचारामुळे प्रेरित झालेल्या आत्महत्या वगैरेंमध्ये लक्षणीय वाढ झाली आहे.

स्त्री-भ्रूणाच्या हत्येमुळे लिंगसंतुलन बिघडून गेले असून पुरुष स्त्री सरासरी ढासळत आहे. काही राज्यांमध्ये तर खूपच चिंताजनक परिस्थिती निर्माण झाली आहे.

मुलामुलींमधील केले जाणारे व वाढत चाललेले भेदभावदेखील याला कारणीभूत आहेत. मुलाच्या बाबत ही धारण आहे की, तो कुटूंबाची आर्थिक सहाय्यता करेल, आईबापांचा आधार बनेल, त्यांची सेवा करेल तर मुलीच्या बाबतीत ती दुसऱ्याची अनामत आहे, ती आई-बापाची सेवा करण्याकरिता नाही, ती आधार नव्हे तर उलट ओझे आहे ही धारणा सर्वत्र आढळते. या धारणेंमुळे जनसामान्यांमध्ये पुत्रमोह व पुत्रीची उपेक्षा रूजत आहे. या विचारांचा प्रभाव त्यावेळेस जाणवतो जेव्हा पुत्रप्राप्तीकरीता एखाद्या बालकाचा बळी दिला जातो! हे नित्यच घडत असते!!

महागाईच्या भस्मासूरानेदेखील भ्रूणहत्येला प्रोत्साहन दिले आहे. गरीब कुटुंबामधून मुलांच्या पालनपोषणाच्या खर्चाच्या भीतीपायी भ्रूणहत्या केली जाते. जास्त मुले विकासामध्ये अडथळा आहेत ही गोष्ट त्यांच्या मनावर बिंबविली गेली आहे. वास्तविक अशाप्रकारचे तर्क, विचारप्रणाली व धारणा पूर्णपणे अनैसर्गिक व असामाजिक आहेत. जर मोठे कुटुंब असणे हे दारिद्र्याचे कारण असते तर देशातील प्रमुख उद्योगपती व व्यापारी आज दरिद्री दिसले असते.

समाजातील भ्रूणहत्येचे वाढते प्रमाण ढासळणाऱ्या नैतिकतेची निशाणी आहे. सध्याच्या चंगळवादी संस्कृतीने आगीत तेल ओतण्याचे काम केले आहे. समाजामध्ये रुजत चाललेल्या अती खुलेपणाने लज्जाहीनतेबरोबरच लोकांना संवेदनहीन बनविले आहे. या मुक्तपणाने व चंगळवादी संस्कृतीने अवैध संबंधांना पशुपातळीपर्यंत नेऊन ठेवले आहे. याच मार्गाने अवैध संबंध व भ्रूणहत्या वाढत आहेत. याची आकडेवारी खूप मोठी आहे आणि सगळा मामलाच गुपचूप असल्यामुळे खरी आकडेवारी कधीच समोर येत नाही.

भ्रूणहत्येमध्ये डॉक्टरांची भूमिका सर्वांत जास्त किळसवाणी राहीली आहे. खूप जणांचा तर हा धंदाच बनला आहे. छोट्या वस्त्यांमधील कमी चालणाऱ्या दवाखान्यांनी तर गर्भपात व भ्रूणहत्येच्या दुकानी थाटल्या आहेत. नव्वदीच्या दशकाच्या आरंभी जयपूर मधील एका खासगी दवाखान्यामध्ये 'ॲमनियोसेंटेसीस' तंत्रज्ञाद्वारे गर्भलिंग चिकित्सेला सुरुवात झाली होती. तेथील स्थानिक डॉक्टरांच्या विधानानुसार तेथे प्रतिदिन १० भ्रूणहत्या होतात. १९९० मध्ये तेथे गर्भलिंग परीक्षणाचे १४०० + गर्भपाताचे १२०० असे २६०० रुपये घेतले जात होते. आपली राजधानी दिल्ली तसेच उत्तर प्रदेशातील कानपूर, लखनौ सारख्या महानगरांमधून हा व्यवसाय जोमात चालू आहे. एका आकडेवारीनुसार १९७८ ते १९८३ दरम्यान देशभरात अंदाजे ७८,००० भ्रूणहत्या घडल्या होत्या. आजदेखील प्रतिवर्षी १८५६० स्त्री भ्रूणहत्या घडत आहेत.

वैद्यकीय क्षेत्रातील अल्ट्रासाऊंड सोनोग्राफी क्रांतीनंतर तर या कृत्यामध्ये जास्तच वाढ झाली. कित्येकवेळा निव्वळ पैशांच्या हव्यासापोटी पुरुषगर्भाला स्त्रीगर्भ ठरवून गर्भपात केला जातो. 'लिंग परीक्षण प्रतिरोध कायदा' बनूनदेखील गर्भलिंग चिकित्सा चालूच आहे.

वैद्यकीय ज्ञानाचा दुरुपयोग या कामाकरिता वारंवार होतो. आता तर गर्भाला चिरडण्याऐवजी 'एमक्रेडिल' नावाचे औषध गर्भाशयात सोडले जाते. त्यामुळे गर्भ बाहेर पडतो. गर्भ तीन किंवा चार महिन्याचा झाल्यानंतरच गर्भलिंग निदान होऊ शकते. यानंतरच गर्भपात संभव असतो. गर्भलिंग निदान बहुतांशी वेळा चुकीचेदेखील असू शकते. डॉक्टरांनुसार एकही गर्भलिंग निदान पद्धती शंभर टक्के अचूक नाही.

शासनकृत पर्याप्त कायदे व नियम असूनदेखील भ्रूणहत्यांची संख्या लक्षणीय आहे. याबाबत पूर्वी फक्त भारतीय दंडविधान संहिता (आय.पी.सी.) व्यतिरिक्त कायदा नव्हता परंतु आता तर 'मेडीकल टर्मिनेशन ऑफ प्रेग्नेंसी ॲक्ट'' (ए.टी.पी.) व्यतिरिक्त राज्यशासनांचे वेगवेगळे कायदे व नियम अस्तित्वात आहेत.

या प्रकरणातील शासनाची उदासीनता संदेहात्मक आहे. अशी शंका घ्यावयाला जागा आहे की, या उदासीनतेमागे येणकेण प्रकारे लोकसंख्या नियंत्रणाचा उद्देश तर नाही ना? सरकारचा हेतू हा तर नाही ना, की या निमित्ताने लोकसंख्या वाढीचा दर कमी रहावा?

समाजामध्ये प्रचलित भ्रूणहत्येने उघड केले आहे की, व्यवस्थेमध्ये काही तरी कमतरता आहे. जाणतेपणे असो वा अजाणतेपणे ही कमतरता खूपच घातक आहे. हे तर उघड सत्य आहे की, भ्रूणहत्या स्त्री-बिजांचीच होते. याबरोबरच प्रतिवर्षी २५००० स्त्रिया अन्य कारणांनी मृत्यू पावतात. हे स्पष्ट आहे की भ्रूणहत्येच्या अपराधामध्येदेखील पक्षपात आहे. त्याचप्रमाणे भ्रूणहत्या करविणाऱ्यांमध्ये बहुसंख्य लोक हुंड्याच्या भीतीपायी स्त्री-भ्रूणाची हत्या करतात अथवा अवैध गर्भाची लोक लाजेस्तव हत्या होते. या एकतर्फी स्त्री-भ्रूणहत्येला जर थोपविले गेले नाही तर समाजामध्ये एक कधीही भरून न निघणारी पोकळी निर्माण होईल.

निव्वळ भ्रूणहत्या विरोधी कायदा बनवून चालणार नाही तर शासनाने त्या असामाजिक प्रवृत्तींवर अंकुश लावला पाहिजे, ज्यामुळे भ्रूणहत्या घडतात.

सामाजिकदृष्ट्या जागरुक वर्गाने पुढाकार घेतला पाहिजे, जेणे करून समाजाला ग्रासणाऱ्या अशा रूढीवादी परंपरांमधील दोष व कमतरता संपविल्या जाव्यात. भ्रूण हत्या समाजातून हद्दपार व्हावी अथवा नाही हे पूर्णपणे महिलांच्या विचारप्रणालीवर, आचारविचारांवर अवलंबून असल्यामुळे महिलांनी विशेषतः पुढाकार घेतला पाहिजे.

# नवजात मुलीचे कलेवर आणि कुत्रा

- डॉ. मुहम्मद अहमद

होय, त्या दृश्याने तेथील चहा पिणाऱ्यांना निव्वळ स्तब्धच केले नाही तर अंतर्बाह्य हलवून सोडले. सुरुवातीला कोणाचाही विश्वासच बसला नाही की कुत्र्याच्या तोंडामध्ये एका नवजात बालिकेचे कलेवर आहे. ही घटना कुरुक्षेत्रातील एस.टी. स्टँड जवळील 'ज्योतिसर टूरिस्ट कॉम्प्लेक्स' समोरील कचरा कुंडीतील आहे, जेथे कुत्र्याने त्या नवजात बालिकेच्या शरीरामध्ये आपले दात रोवले ते हेच ज्योतिसर आहे जिथे गीता सांगितली गेली अशा विश्वास आहे. पोलिसांना सूचीत केल्यानंतर उप-अधीक्षक कमलदीप तेथे पोहोचले व नेहमीप्रमाणे सामान्य प्रक्रिये (?) द्वारे कारवाई सुरु केली.

'दैनिक भास्कर' (१८ मार्च २००९, हिसार आवृती) नुसार निव्वळ मुलगी असल्यामुळे तिला हे अतीभयानक व निर्मम हाल झेलावे लागले. कुठे गेली मातेची ममता? आईबापांची संतानाप्रतिच्या नैसर्गिक प्रेमाची, वात्सल्याची तिरडी कोणी उचलली? इतका रानटी बनला हा चंगळवादी समाज? वेळोवेळी डोळ्यांसमोर येणारे स्त्री-भ्रूणहत्येचे आकडे समाजाच्या क्रूरतेला उघड करतात. बापाच्या कर्तव्याबाबत-देखील प्रश्न निर्माण झाले आहेत. मुलींच्या घटणाऱ्या सरासरी बाबतीची आकडेवारी समोर असूनदेखील वृत्तपत्रे व मिडिया ढिम्म आहे तर सर्व समाजधूरीण असे स्थीतप्रज्ञ आहेत जणू मुके, बहिरे आणि अंध झाले आहेत. कधी कधीतरी असे वाटते की यांना नकारात्मक मुद्यांशीच घेणे देणे असून मानवरुपामध्ये मानवतेचे शत्रू आहेत की काय?

उपलब्ध आकडेवारीनुसार पंजाब, हरियाणा प्रांतामध्ये स्त्री भ्रूणहत्येचे प्रमाण सर्वाधिक असून त्यामुळे स्त्री पुरुष प्रमाण चिंताजनकरित्या खाली घसरले आहे. काही दिवसांपूर्वीच हरियाणातील एका गावामध्ये जिवंत मुलीचा जन्म ही मोठी बातमी बनली कारण कित्येक वर्षानंतर हे घडले होते. या गावामध्ये मुलीला जीवंतच राहू दिले जात नव्हते. मुलगी घरामध्ये असणे स्वतःचा व कुळाचा अपमान समजले जाई व जावई करून घेणे हे नाक कापण्यासारखे मानले जाई. अरब द्वीपकल्यामध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आगमनापूर्वीच्या अज्ञानकालामध्ये अशीच परिस्थिती होती. इस्लामने या विषम स्थितीला पूर्णपणे बदलून टाकले आणि मुलींना यथायोग्य पालनपोषण व सन्मान भेटू लागला. इस्लामच्या शिकवणीतील एक उल्लेखनीय तत्त्व स्त्रियांची प्रतिष्ठा व सन्मान आहे.

पवित्र कुरआन मानवतेकरिता ईशसंदेश व मार्गदर्शन आहे. याच्या ८१ व्या अध्यायामध्ये अंतिम प्रलयाचे दृष्य रेखाटले आहे. त्या दिवशी इतर प्रश्नांबरोबर

हेदेखील विचारले जाईल

"आणि जेव्हा जीवंत गाडलेल्या मुलीला विचारले जाईल, की ती कोणत्या अपराधापायी ठार केली गेली?" (दिव्य कुरआन, ८१:८- ९)

जगत-उद्धारक पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तुम्हांपैकी एखाद्याच्या तीन मुली अथवा बहिणी असतील आणि जर तो त्यांच्या बरोबर सद्व्यवहाराने वागत राहिला तर तो नि:संशय स्वर्गामध्येच जाईल. (हदीस : तिर्मिजी)